**आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे यांच्या आस्थापनेवरील भिक्षेकरी गृहातील ५२ पदांना दि. १.३.२०१५ ते दिनांक २९.२.२०१६ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मबाआ-२०१५/प्र.क्र.५/का-७-अ**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.
तारीख: **२ मार्च, २०१५.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दिनांक ५ एप्रिल, २००३
२) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१५/प्र.क्र.५/वित्तीय सुधारणा-१, दिनांक २०/२/२०१५
३) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ- २०१४/प्र.क्र.३३/का-७ दिनांक २५ फेब्रुवारी, २०१४.
४) उपआयुक्त (प्रशासन), महिला व बाल विकास आयुक्तालय,पुणे यांचेकडील क्र . मबाविआ/आस्था /अस्थायी पदे/ १४-१५/५०३, दिनांक २८.१.२०१५.

**शासन निर्णय:-**

महिला व बाल विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयांमधील पदांचा आढावा घेवून सुधारित आकृतीबंध शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र. मबाआ-२००२/प्र.क्र.९५/का-७, दि. ५.४.२००३ अन्वये मंजूर केलेला आहे. सदर सुधारित आकृतीबंधानुसार भिक्षा प्रतिबंधक शाखेअंतर्गत कार्यरत असलेल्या ५२ अस्थायी पदांना संदर्भाधीन क्र.३ च्या शासन निर्णयान्वये दि. २८.२.२०१५ पर्यत पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. त्याची मुदत दि. १.३.२०१५ रोजी संपुष्टात येत असल्याने या शासन निर्णयन्वये भिक्षा प्रतिबंधक शाखेतर्गत कार्यरत असलेल्या ५२ अस्थायी पदांपैकी एकही पद ६ महिन्यापेक्षा जास्त काळ रिक्त नाही असे उप आयुक्त (प्रशासन) महिला व बाल विकास यांनी त्यांच्या संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये प्रमाणित केले आहे. त्यानुसार सदर पदांना दि. १.३.२०१५ ते २९.२.२०१६ पर्यत पुढे सुरु ठेवण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर ५२ पदे पुढे चालू ठेवण्यास मंजूरी दिलेल्या पदांचा तपशील सोबतच्या विवरणपत्राप्रमाणे राहील.

३. हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्र.प्रदनि-२०१५/प्र.क्र.५/१५ वित्तीय सुधारणा दि. २०/२/२०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२०१११२१२९०३० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahendra Babusing Hajari

Digitally signed by Mahendra Babusing Hajari
DN: CN = Mahendra Babusing Hajari, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Deputy Secretary
Reason: I am the author of this document
Date: 2015.04.21 16:25:45 +05'30'

**म. बा. हजारी**
**शासनाचे उप सचिव**

प्रत,

महालेखापाल,महाराष्ट्र राज्य १/२ (लेखा व अनुज्ञेयता) ( लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे
सर्व जिल्हा महिला बाल विकास अधिकारी,
अधिदान व लेखा अधिकारी,मुंबई,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग (का-६/वित्तीय सुधारणा-१), मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती, का-७अ